**महाराजा सयाजीराव गायकवाड चरित्र साधने <u>प्रकाशन समिती पुनर्गठीत करण्याबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२१/प्र.क्र.११८/आस्था-२,**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२
दिनांक : २५ ऑक्टोबर, २०२१

<u>वाचा</u> :-

१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय, क्रमांक-१११९/(८१/१६ )/समन्वय, दिनांक १७ ऑक्टोबर, २०१६.

२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय, क्रमांक-१११९ /(८१/१६ )/समन्वय, दिनांक २३ जानेवारी,२०२०.

<u>प्रस्तावना :-</u>

महाराष्ट्राच्या वैचारिक,सामाजिक, राजकीय व शैक्षणिक बांधणीत विठ्ठल रामजी शिंदे, कर्मवीर भाऊराव पाटील, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, अशा अनेक समाजधुरिणांचे योगदान आहे. या सर्वांना महाराजा सयाजीराव गायकवाड यांची थेट मदत होती. या सर्व समाजधुरिणांनी महाराजा सयाजीराव गायकवाड यांचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख केलेला आहे. आजही सयाजीराव गायकवाड यांच्या कार्यकर्तृत्वाचा आणि राजकीय, सामाजिक प्रयोगांचा नमुनादर्शक उपयोगी पडू शकतो. महाराष्ट्र शासनाने राज्याच्या पुरोगामित्वाची जडणघडण करण्यास प्रेरणादायी ठरलेल्या या आदिनेत्याची ओळख जागविण्यासाठी विशेष कृती-प्रकल्प हाती घ्यावा, या उद्देशाने महाराजा सयाजीराव गायकवाड चरित्र साधने प्रकाशन समितीची स्थापना उपरोक्त क्र.१च्या शासन निर्णयान्वये करण्यांत आली होती. या समितीची मुदत दिनांक १७/१०/२०१९ रोजी समाप्त झाली. या कालावधीत समितीमार्फत महाराजा सयाजीराव गायकवाड यांच्या जीवनावर आधारित २५ नियोजित ग्रंथापैकी १२ ग्रंथाच्या खंडांची छपाई व प्रकाशन करण्यात आले. उर्वरित १३ खंडाच्या छपाईस मान्यता देण्याकरीता समितीचा कार्यकाल दिनांक १७/१०/२०१९ पासून पुढे सहा महिन्याकरिता मुदतवाढ देण्यात आली होती. या काळात १३ खंडांच्या छपाईचे काम पूर्ण करण्यात आले आहे. परंतु कोव्हीड-१९चा प्रभाव लक्षात घेता या खंडाचे प्रकाशन करण्याकरीता कार्यक्रमाचे आयोजन करता आले नाही. वरीलप्रमाणे १३ खंडांचे प्रकाशन करणे व आगामी काळात महाराजा सयाजीराव गायकवाड यांचे जीवनावर आधारित इतर साहित्याचे संकलन, संपादन, प्रकाशन करण्याकरीता महाराजा सयाजीराव गायकवाड चरित्र साधने प्रकाशन समितीचे पुनर्गठन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराजा सयाजीराव गायकवाड यांची ग्रंथसंपदा प्रकाशित करण्यासाठी खालीलप्रमाणे महाराजा सयाजीराव गायकवाड चरित्र साधने प्रकाशन समिती पुनर्गठीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.
महाराजा सयाजीराव गायकवाड चरित्र साधने प्रकाशन समिती, औरंगाबाद.

| नियुक्त करावयाचे शासकीय/अशासकीय सदस्य. | पद |
|---|---|
| १) मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) | अध्यक्ष |
| २) मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) | उपाध्यक्ष |
| ३) मा. प्रधान सचिव (उच्च व तंत्र शिक्षण) | सदस्य |
| ४) संचालक, उच्च शिक्षण महराष्ट्र राज्य, पुणे. | निमंत्रक |
| ५) संचालक, शासकीय मुद्रणालय, लेखा सामग्री व प्रकाशन, मुंबई. | सदस्य |
| ६) श्रीमती राजमाता शुभांगीनी राजे गायकवाड | सदस्य |
| ७) श्रीमती अनुराधा मोहिनी, नागपूर | सदस्य |
| ८) डॉ. भारती पाटील, कोल्हापूर | सदस्य |

| | |
|---|---|
| ९) श्री. प्रकाश पेठे, बडोदे | सदस्य |
| १०) प्रा. शिवाजी देवनाळे, लातूर | सदस्य |
| ११) श्रीमती मंदा हिंगुराव, बडोदे | सदस्य |
| १२) डॉ. विजय शिंदे, औरंगाबाद | सदस्य |
| १३) दिनेश पाटील, वारणानगर, जि. कोल्हापूर | सदस्य |
| १४) डॉ. बाबा भांड | सदस्य-सचिव |

२. महाराजा सयाजीराव गायकवाड चरित्र साधने प्रकाशन समितीची मुदत प्रारंभी तीन वर्षेपर्यंत राहील.

३. महाराजा सयाजीराव गायकवाड चरित्र साधने प्रकाशन समितीची उद्दीष्टे व सदस्य सचिवांची कार्यकक्षा, सदर समितीच्या कामकाजाकरीता आवश्यक पदे याबाबतच्या तरतुदी उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय, क्रमांक-१११/(८१/१६)/समन्वय, दिनांक १७ ऑक्टोबर, २०१६ प्रमाणे राहतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११०२५१२१२१३११०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2021.10.25 12:16:37 +05'30'

**( प्रताप पां. लुबाळ )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मंत्री (उ.व तं.शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. राज्यमंत्री (उ.व तं.शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) मा. प्रधान सचिव (उ.व तं.शि.), मंत्रालय, मुंबई.
८) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग (कार्यासन विघयो) मंत्रालय,
९) वित्त विभाग (व्यय-५/व्यय-१४) मंत्रालय, मुंबई.
१०) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११) महाराजा सयाजीराव गायकवाड समितीचे सदस्य-सचिव ( संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत)
१२) महाराजा सयाजीराव गायकवाड समितीचे सर्व सदस्य (संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत)
१३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-I, II, मुंबई/नागपूर.
१४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई त्यांना विनंती आहे की, प्रस्तुत शासन निर्णयाला व्यापक प्रसिद्धी तात्काळ द्यावी.
१५) सर्व सह/उप सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) निवडनस्ती (आस्था-२).